महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२४.
सन २०२४-२०२५ चे निधी वितरण

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०२४/प्र.क्र. ५२/अर्थसंकल्प,

गोपालदास तेजपाल रुग्णालय आवार, नविन मंत्रालय
मुंबई - ४०० ००१.
दिनांक: १९ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-**

१) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१ एप्रिल,२०२४ व दि. २५.०७.२०२४.**
२) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक:अर्थसं-२०२४/प्र.क्र.१८/अर्थसंकल्प, दि. २० फेब्रुवारी, २०२४ व दि. १५ मार्च, २०२४**
३) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२४/प्र.क्र.२६/अर्थसंकल्प, दि. ३०.०७.२०२४.**

**प्रस्तावना -**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध कल्याणकारी योजनांची प्रसिद्धी व प्रचार हा समाजाच्या सर्व स्तरांच्या लोकांपर्यंत प्रभावीपणे पोहोचविण्याकरीता शासनामार्फत केलेल्या जाहीरातींचे प्रलंबित देयके अदा करण्यासाठी वित्त विभागाकडून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) प्राप्त झालेला निधी नियंत्रक अधिकारी (सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन) पुणे) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील सार्वजनिक आरोग्य विभागासाठी अर्थसंकल्पीत झालेला व वित्त विभागाकडून BEAMS प्रणालीवर प्राप्त झालेला निधी पुढीलप्रमाणे नियंत्रक अधिकारी यांना वितरीत करण्यात येत आहे.

**(रुपये हजारात)**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | नियंत्रक अधिकारी | वितरीत अनुदान |
|---|---|---|---|
| | **मागणी क्रमांक आर -१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य** | | |
| १ | **"(०१) (०२) आरोग्यविषयक प्रसिध्दी केंद्रे (२२१०१०४४), २६- जाहीराती व प्रसिध्दी"** | सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ. व प्रशासन) पुणे (**R0002**) | **१४,५८,०७.७०५** |

सदर निधी खालील तक्त्यात नमूद देयके अदा करण्या करीता खर्च करण्यात यावा.

| Sr. No. | Agency Name | Media | Bill Amount | GST १८% | Total |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Gspk Consultancy Pvt. Ltd. | Social Media | ११०५५९४० | १९९००६९ | १,३०,४६,००९ |
| 2 | RW Promotion Pvt.Ltd. | Arogya Rath | ६२७५८९०० | ११२९६६०२ | ७,४०,५५,५०२ |
| 3 | Span Communication | Local Cable | ८८२०००० | १५८७६०० | १,०४,०७,६०० |
| 4 | Pinnacle Teleservices Pvt. Ltd. | Whats App / Chatbot | २४७०७७६२ | ४४४७३९७ | २,९१,५५,१५९ |
| 5 | Pinnacle Teleservices Pvt. Ltd. | SMS | ७३९१२५० | १३३०४२५ | ८७,२१,६७५ |
| 6 | Shivam Advertising Agency | ST Stand LED /LCD | ८८३२००० | १५८९७६० | १,०४,२१,७६० |
| | | TOTAL | १२,३५,६५,८५२ | २,२२,४१,८५३ | १४,५८,०७,७०५ |

२. सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला उपरोक्त निधी / अनुदान खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे :-

१) ज्या उद्देशासाठी निधी / अनुदान मंजूर करण्यात आला आहे त्या व्यतिरिक्त इतर उद्देशासाठी सदर निधी खर्च करता येणार नाही. तसेच इतर लेखाशिर्षाकडे वळती करता येणार नाही.

२) सदर खर्चाचा प्रगती अहवाल मासिक निधी विवरणपत्रानुसार नियंत्रक अधिकाऱ्यांनी दरमहा १० तारखेपर्यंत शासनास सादर करावा.

३) अनुदान अदा करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या नियमांचे पालन करावे. तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१, उपविभाग एक मधील अटी व शर्तीचे पालन करुन सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता घेवून अनुदान अदा करावे.

४) खाजगी स्वंयसेवी संस्थांना अनुदान उपलब्ध करुन देताना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१, उपविभाग एक मधील अनुक्रमांक २७, नियम १४९ प्रमाणे सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेवून अनुदान अदा करावे.

५) ज्या निधीच्या वितरणासाठी प्रशासकीय मान्यता आदेशाची आवश्यकता आहे असा निधी वितरीत करताना वित्तीय अधिकार नियमपुस्तीका, १९७८ भाग-१, उपविभाग-तीन, अनुक्रमांक-चार, नियम २७ (२) अन्वये प्रदान केलेल्या अधिकाराप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आदेश निर्गमित झाल्यानंतर अनुदान अदा करावे.

६) विविध शासकीय / प्रशासकीय संस्थांना तसेच अनुदानित संस्थांना सहायक अनुदाने मंजूर करण्यापूर्वी त्यांचेकडून पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाच्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधीत नियंत्रण अधिकारी यांनी विभागास सादर करावीत. यापूर्वी दिलेल्या अनुदानाचा विनियोग पूर्ण झाल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत करण्यात येऊ नये. कोषागार अधिकाऱ्यांनी, सहायक अनुदानामधून निधी आहरित करण्यासाठी सादर केलेल्या देयकासोबत संबंधित संस्थेचे लगतच्या

मागील महिन्यातील बँक अकाऊंट स्टेटमेंट (Bank Account Statement) ची प्रत जोडलेली नसल्यास देयक पारित करु नये.

७) शासनाव्दारे देण्यात येणारे वेतन अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS व्दारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरीत्या व Offline पध्दतीने वितरीत करण्यात येऊ नये.

८) थकित देयकांच्या प्रदानासाठी खर्च करण्यात येणाऱ्या प्रकरणी खरेदी केलेले साहित्य प्रत्यक्ष प्राप्त झाल्याचे व त्याचे लेखे सुयोग्यरित्या ठेवल्याची खात्री पटल्याशिवाय तो निधी आहरित करण्यात येऊ नये.

९) उपरोक्त अटी व शर्ती बरोबरच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तीचे पालन करणे आवश्यक राहील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४, नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २२१/१४७२, दि. ०४.०७.२०२४ तसेच वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ३९४/२०२४/ व्यय-१३, दि. १४.०८.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमती नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८१९१५२८३७८६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2024.08.19 17:36:23 +05'30'

**(विकास तु. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर.
४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
८. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ. व प्रशासन), पुणे.
९. उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे.

१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११. वित्त विभाग ( कार्यासन व्यय-१३ / अर्थ- ९) मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग (कार्यासन १४७२), मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती, (कार्यासन अर्थसंकल्प).